आस्थापना मंडळापुढे सादर करावयाचे प्रस्ताव

परिपूर्ण प्रस्ताव सादर करण्यासंदर्भातील सूचना

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक ईएसबी-११०३/प्र.क्र.४३/२००३/१३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: १६ जुलै, २००३

वाचा:१) शासन परिपत्रक क्रमांक:ईएसबी-१०८५/३७६/प्र.क्र.३८/८५/१३, दिनांक १९ मे, १९८७
२) शासन परिपत्रक क्रमांक:ईएसबी-११०२/प्र.क्र.१८/२००२/१३, दिनांक ३० मार्च, २००२
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर, २००१

## शासन परिपत्रक

संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १९ मे, १९८७ च्या परिपत्रकातील परिच्छेद ४ मध्ये आस्थापना मंडळापुढे प्रस्ताव सादर करण्याची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. तथापि, असे निदर्शनास आलेले आहे की, सदर परिपत्रकात दिलेल्या सूचनांप्रमाणे कार्यवाही न करता अपूर्ण माहितीचे प्रस्ताव विभागाकडून आस्थापना मंडळाच्या विचारार्थ या विभागास सादर केले जातात. विभागांकडून सादर केल्या जाणाऱ्या प्रस्तावासोबत अद्ययावत गोपनीय अहवाल सादर न करणे, सेवाप्रवेश नियमांची प्रत, कनिष्ठ संवर्गाची अंतिम ज्येष्ठता यादी सादर न करणे, जोडपत्र "अ", "ब", "क" व "ड" मधील अपूर्ण माहिती तसेच त्यावर सक्षम अधिकाऱ्यांची सही नसणे इत्यादी त्रुटी असतात.

२. संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक ३० मार्च, २००२ च्या शासन परिपत्रकान्वये, आस्थापना मंडळास सादर करावयाचे पदोन्नतीचे प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाला पाठविण्यापूर्वी विभागांनी पदांचा आढावा घेऊन प्रस्ताविलेली रिक्त पदे भरण्यास उच्चस्तर सचिव समितीने मान्यता दिली असल्याचे प्रस्तावात विविक्षितपणे नमूद करणे आवश्यक राहील असे स्पष्ट केलेले आहे. तथापि, असे निदर्शनास आले आहे की, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक १०/०९/२००१ च्या शासन निर्णयात दिलेल्या सूचनांप्रमाणे पदांचा आढावा न घेता तसेच रिक्त पदे भरण्यास उच्चस्तर समितीची मान्यता न घेताच पदे भरण्याचे/निवडसूची तयार करण्याचे प्रस्ताव विभागांकडून सादर केले जातात.

३. प्रस्तावात असलेल्या त्रुटी विभागांना कळविण्यात आल्यानंतरसुध्दा विभागांकडून त्रुटींची पूर्तता लवकर केली जात नाही. अपूर्णावस्थेतील प्रस्ताव आस्थापना मंडळापुढे ठेवता येत नाहीत. विभागांकडून त्रुटींची पूर्तता न झाल्यामुळे सदर प्रस्ताव बराच काळ या विभागाकडे प्रलंबित राहतात. विभागाकडून देखील त्रुटींची पूर्तता न करता प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागात प्रलंबित असल्याचे सांगितले जाते असेही निदर्शनास आले आहे. त्यामुळे प्रस्तावावर कार्यवाही करण्यासाठी सामान्य

कृ.मा.प.

प्रशासन विभागाकडून विलंब होत असल्याचा अकारण गैरसमज निर्माण होतो. या संदर्भात प्रस्तावाच्या छाननी अंती प्रस्तावात त्रुटी असल्यास सदर प्रस्ताव विभागास परत करण्यात यावा व त्रुटींची पूर्तता करून सुधारित प्रस्ताव पाठविण्याबाबत विभागाला कळविण्यात यावे अशा सूचना मुख्य सचिवांनी दिल्या आहेत. त्यानुसार या विभागास सादर होणाऱ्या प्रस्तावात त्रुटी राहू नयेत, ते परिपूर्ण असावेत या दृष्टीने सर्व विभागांसाठी एक तपासणी सूची तयार करण्यात आली आहे. (प्रत सोबत जोडली आहे)

४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना असे कळविण्यात येते की, आस्थापना मंडळापुढे विचारार्थ सादर करावयाचे प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविताना सोबत जोडलेल्या तपासणी सूचीप्रमाणे विभागांनी प्रस्तावाची संपूर्ण तपासणी करून मगच ते सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावेत. अपूर्णावस्थेतील प्रस्ताव यापुढे सामान्य प्रशासन विभागात स्वीकारण्यात येणार नाहीत आणि ते त्रुटींची पूर्तता करण्यासाठी विभागाला परत करण्यात येतील याची प्रशासकीय विभागानी कृपया नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्रकाश लोखंडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) सर्व मंत्रालयीन विभाग
२) निवड नस्ती

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःईएसबी-११०३/प्र.क्र.४३/२००३/१३,
दिनांक १६ जुलै, २००३ चे जोडपत्र.

## आस्थापना मंडळास सादर होणाऱ्या प्रस्तावांची तपासणी सूची

रिक्त पदांची/निवड करावयाच्या अधिकाऱ्यांची संख्याः

पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणीः

दिनांक १९ मे, १९८७ च्या आदेशानुसार प्रस्ताव विहित
कालावधीत सादर केला आहे काय?

---

| तपासणीचे मुद्दे | पूर्ततेची सद्यःस्थिती |
|---|---|

---

१) सेवा प्रवेश नियमः

(अ) सेवा प्रवेश नियम उपलब्ध केले आहेत
काय? असल्यास नियमांचा दिनांकः

(ब) सेवाभरतीसाठी गुणोत्तर

| एकूण मंजूर पदसंख्या स्थानापन्नः | सरळसेवा | पदोन्नती |
|---|---|---|

---

| सद्यःस्थितीत नियमित पदोन्नतीसाठी रिक्त पदे | वर्षभरात पदोन्नतीसाठी उपलब्ध होणारी पदे | एकूण किती पदांची निवडसूची करावयाची आहे |
|---|---|---|
| | | |

---

(क) पदोन्नती पदोन्नतीच्या कोटयामधील
पदांवरच आहे काय?

(ड) पदोन्नतीचा निकट संवर्गः

(ई) पदोन्नतीसाठी अर्हता/पात्रताः

(फ) पदोन्नतीसाठी अनुभवः

(ग) विचाराधीन अधिकारी सेवाप्रवेश नियमानुसार
पदोन्नतीसाठी विहित सर्व अटी पूर्ण करतात काय?

(ह) इतर मुद्देः

कृ.मा.प.

२) <u>ज्येष्ठता सूची</u>

(अ) कनिष्ठ संवर्गाची अंतिमतः प्रसिध्द केलेली ज्येष्ठतासूची उपलब्ध केली आहे काय?

(ब) कनिष्ठ संवर्गाच्या निवडसूच्यांना आयोगाची मान्यता मिळाली आहे काय?(आयोगाच्या कक्षेतील पदांसाठी)

(क) ज्येष्ठतेबाबत काही तक्रारी/न्यायालयात दावे आहेत काय?

(ड) उपलब्ध ज्येष्ठतासूचीतील कोणी वरिष्ठ पदोन्नतीसाठी डावलले गेले आहेत काय?

(इ) विचाराधीन क्षेत्रातील अधिकारी ज्येष्ठताक्रमानुसार आहेत काय?

(फ) ज्येष्ठ अधिकारी पूर्वी केव्हा डावलेले गेले/ पूर्वीच्या आस्थापना मंडळाच्या बैठकीचा दिनांकः

(ग) ज्येष्ठ अधिकाऱ्यांचा पदोन्नतीसाठी विचार करण्यात येत नसल्यास कारणेः

३) <u>पदांचा आढावा</u>

(अ) पदांचा/संवर्गाचा आढावा पूर्ण झाला आहे काय/ आकृतीबंध निश्चित झाला आहे काय?

(ब) रिक्त पदे व्यपगत झाली आहेत काय? असल्यास ती पुर्नजिवित करण्यास वित्त विभागाची मान्यता घेतली आहे काय?

४) यापूर्वीची निवडसूची तयार केलेल्या आस्थापना मंडळाच्या बैठकीचा दिनांकः

५) पदोन्नतीचे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील आहे काय?

६) असल्यास पूर्वीच्या निवडसूच्यांना आयोगाची मान्यता मिळालेली आहे काय? सद्यःस्थितीः

७) विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांची संख्याः

अ) ही संख्या प्रचलित आदेशानुसार बरोबर आहे काय?

ब) नसल्यास, संयुक्तिक कारणे:

क) नियुक्त्या/पदोन्नत्या आयोगाकडून नियमित
झाल्या आहेत काय?

८) सर्व जोडपत्रे (अ,ब,क,ड) जोडली आहेत काय?

९) जोडपत्र "ब" मध्ये सर्व माहिती विशेषत:
पुर्नविलोकनाबाबत व मागासवर्गीयांबाबत
दिली आहे काय?

१०) सर्व अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवाल नस्त्या
अद्ययावत आहेत काय?
अ) नसल्यास कोणाचे व कोणत्या वर्षाचे
अहवाल नस्तीमध्ये नाहीत.
त्याबाबत प्रमाणपत्रे गोपनीय अहवाल
नस्तीत समाविष्ट केली आहेत काय?

११) गोपनीय अहवालातील प्रतिकूल शेरे
कळविण्यात आले आहेत काय?
अ) विहित मुदतीत:
ब) उशिरा:
क) त्यासंबंधात अभिवेदन केले आहे काय?
ड) असल्यास त्याबद्दलची सद्यस्थिती:

१२) गेल्या पाच वर्षांच्या कालावधीतील गोपनीय
अहवालातील पदोन्नतीच्या पात्रतेपर्यंत न येणारे
शेरे विहित मुदतीत कळविले आहेत काय?

१३) विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांपैकी कोणी
निलंबित आहे काय?

१४) विचाराधीन क्षेत्रातील कोणाविरूध्द विभागीय चौकशी
प्रस्तावित/चालू आहे काय? असल्यास सद्य:स्थिती:

१५) विचाराधिन क्षेत्रातील कोणी अधिकारी शिक्षा
भोगीत असल्यास त्याबाबतचा तपशील:

कृ.मा.प.

१६) विचारक्षेत्रतील अधिकाऱ्यांपैकी कोणाचा
पूर्वी विचार होऊन ते अयोग्य आढळले
होते काय?
अ) असल्यास त्यावेळी कोणत्या वर्षाचे
गोपनीय अहवाल विचारात घेतले होते?
ब) त्यानंतर दोन वर्षाचे गोपनीय अहवाल
उपलब्ध झाले आहेत काय?

१७) प्रस्तावाबाबत स्वयंस्पष्ट टिप्पणी उपलब्ध
केली आहे काय?

१८) इतर काही विविक्षित बाबी
काही न्यायालयीन प्रकरणे आहेत काय?

१९) <u>जोडपत्रातील माहितीबाबत</u>
सर्व जोडपत्रातील माहिती प्रमाणित
केली आहे काय?